मुंबई उच्च न्यायालयाच्या सेवानिवृत्त
मुख्य न्यायमुर्तींना राज्य अतिथिंच्या
यादीत अंतर्भूत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एसजीएच १०१५/२६३/३०**
सचिवालय जिमखाना, १ ला मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०००३२.
दिनांक:- २८.०१.२०१५

**प्रस्तावना:**

शासन निर्णय क्रमांक १००२/६८८/प्र.क्र.९२/३१, दिनांक ०१.०१.२००४ अन्वये सुधारीत राज्यअतिथि नियम निर्गमित करण्यात आले आहेत. सदर नियमाच्या मराठी प्रतीमधील जोडपत्र "क" व इंग्रजी प्रतीमधील ANNEXURE "A" मध्ये नमूद असलेल्या राज्यअतिथिंच्या यादीत, मुंबई उच्च न्यायालयात मुख्य न्यायमुर्ती म्हणून किमान ३ वर्षाची सेवा बजावलेल्या व निवृत्तीनंतर महाराष्ट्र राज्याबाहेर स्थायिक झालेल्या माजी मुख्य न्यायमुर्तींना अंतर्भूत करुन घेण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. त्या संदर्भात शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:**

मुंबई उच्च न्यायालयात मुख्य न्यायमुर्ती म्हणून किमान ३ वर्षाची सेवा बजावलेल्या व निवृत्तीनंतर महाराष्ट्र राज्याबाहेर स्थायिक झालेल्या माजी मुख्य न्यायमुर्तींना शासन निर्णय क्र.एसजीआर १००२/ ६८८/प्र.क्र.९२/३१, दिनांक ०१.०१.२००४ अन्वये अधिसूचित झालेल्या राज्यअतिथि नियम २००४ च्या मराठी प्रतीमधील जोडपत्र "क" व इंग्रजी प्रतीमधील ANNEXURE "A" मध्ये अंतर्भूत करण्यात येत आहे. त्यांना ते ज्या ज्या वेळी राज्यात येतील त्यावेळी राज्यअतिथि नियम २००४ नूसार अनुज्ञेय सर्व सुविधा सदर नियमातील अटी व शर्तींच्या अधीन अनुज्ञेय असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०१२८१२३११४७४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानूसार

Satish J Moghe

Digitally signed by Satish J Moghe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Satish J Moghe
Date: 2015.01.28 16:52:20 +05'30'

**( स.ज.मोघे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीकरीता.

१. मा. प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
३. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मुंबई
४. महाराष्ट्र शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मुंबई
५. सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
६. महाराष्ट्र शासनाचे सर्व विभागीय आयुक्त.
७. महाराष्ट्र शासनाचे सर्व जिल्हाधिकारी.
८. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई
९. व्यवस्थापक, सह्याद्री व नंदगिरी राज्यअतिथिगृह, मुंबई.
१०. निवडनस्ती.